महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारीत वेतन) नियम, २००९ वेतन पडताळणीसाठी वेतन पडताळणी पथके पुढे चालू ठेवणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- वेपप-२०२०/३१/प्र.क्र.०६ /सेवा-७**
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ९ सप्टेंबर,२०२०.

**पहा** :- १) शासन निर्णय,वित्त विभाग,क्र.संकीर्ण-१००९/प्र.क्र.१६९/सेवा-९,दि.६.११.२००९.
२) शासन निर्णय,वित्त विभाग,क्र.संकीर्ण-१०१०/प्र.क्र.५०/सेवा-९,दि.६.०४.२०१०.
३) शासन निर्णय,वित्त विभाग,क्र.संकीर्ण-२०११/प्र.क्र.१६/सेवा-९,दि.७.०२.२०११.
४) शासन निर्णय,वित्त विभाग,क्र.संकीर्ण-२०११/प्र.क्र.८८/सेवा-७,दि.७.१०.२०११.
५) शासन निर्णय,वित्त विभाग,क्र.संकीर्ण-२०११/प्र.क्र.८८/सेवा-७,दि.९.०३.२०१२.
६) शासन निर्णय,वित्त विभाग,क्र.संकीर्ण-२०११/प्र.क्र.८८/सेवा-७,दि.२.०३.२०१३.
७) शासन निर्णय,वित्त विभाग,क्र.संकीर्ण-२०११/प्र.क्र.८८/सेवा-७,दि.११.०२.२०१४.
८) शासन निर्णय,वित्त विभाग, क्र. संकीर्ण-२०१५/प्र.क्र.१२/सेवा-७,दि.२७.०२.२०१५.
९) शासन निर्णय,वित्त विभाग, क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१०/सेवा-७,दि.२५.०२.२०१६.
१०) शासन निर्णय,वित्त विभाग, क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.८९/सेवा-७,दि.१९.१०.२०१६.
११) शासन निर्णय,वित्त विभाग, क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.८९/सेवा-७,दि.०८.११.२०१७.
१२) शासन निर्णय,वित्त विभाग, क्र. संकीर्ण-२०१७/प्र.क्र.३४/सेवा-७,दि.१०.१०.२०१८.
१३) शासन निर्णय,वित्त विभाग, क्र. संकीर्ण-२०१७/प्र.क्र.३४/सेवा-७,दि.२७.०३.२०१९.
१४) शासन निर्णय,वित्त विभाग, क्र. संकीर्ण-२०१७/प्र.क्र.३४/सेवा-७,दि.३०.०९.२०१९.
१५) शासन निर्णय,वित्त विभाग, क्र. वेपप-२०२०/३१/प्र.क्र.०६/सेवा-७,दि.०३.०३.२०२०.

**प्रस्तावना :-**

दिनांक १ जानेवारी,२००६ पासून सुधारीत वेतनसंरचना विहित केल्याबाबतचे आदेश व सुधारीत वेतनसंरचनेत प्रारंभिक वेतन निश्चित करण्याबाबतचे नियम शासन अधिसूचना, वित्त विभाग, क्रमांक:वेपुर-१२०९/प्र.क्र.२७/सेवा-९,दि.२२.०४.२००९ अन्वये निर्गमित करण्यात आले आहेत. या सुधारीत वेतनसंरचनेमध्ये वेतननिश्चिती करण्यासंदर्भातील मार्गदर्शक सूचना या विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक:वेपुर-१२०९/ प्र.क्र.६९/ सेवा-९,दि.२९.०४.२००९ अन्वये प्रस्तुत करण्यात आल्या आहेत. उपरोक्त दि.०६.११.२००९ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारीत वेतन) नियम,२००९ अन्वये केलेल्या वेतननिश्चितीची पडताळणी करण्यासाठी वेतनपडताळणी पथकाची निर्मिती व बंद केलेली वेतनपडताळणी पथके पुनर्जिवित करण्यात आली आहेत. सदर पथकांतील पदांना पहा येथील शासन निर्णयांनी वेळोवेळी मुदतवाढ देण्यात आली असून अंतिमत: दि.३१.०८.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. तथापि दि.१/१/२००६ पासून सुधारित वेतन संरचनेमध्ये केलेल्या वेतननिश्चितीच्या पडताळणीची कामे अद्याप शिल्लक असल्याने तसेच ७ व्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतननिश्चितीची कामे विचारात घेऊन या पथकातील अस्थायी पदांना पुढील मुदतवाढ देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

१. वित्त विभाग,शा.नि.क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.दि.३१.०८.२०२० अन्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजुर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु त्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.२८/०२/२०२१ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले आहेत.

२. उपरोक्त शासन निर्णयास अनुसरुन शासन आता असे आदेश देत आहे की, पुनर्जिवित करण्यात आलेली नाशिक,अमरावती व कोकण विभाग येथील वेतन पडताळणी पथके व त्याकरीता निर्माण करण्यात आलेली खालील अस्थायी पदे दिनांक दि.०१.०९.२०२० ते दि.२८.०२.२०२१ पर्यंत पुढे चालू ठेवण्यात यावीत व पदांचा आढावा घेवून सुधारीत आकृतीबंधास कोणत्याही परिस्थितीत दरम्यानच्या काळात उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्याची दक्षता घ्यावी.

| अ. क्र. | संवर्ग | ७ व्या वेतन आयोगानुसार | कोकण भवन पदसंख्या | नाशिक पदसंख्या | अमरावती पदसंख्या | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | लेखा अधिकारी (म.वि.वले.से.वर्ग-२, राजपत्रित) | S-16 : 44900-142400 | १ | १ | १ | ३ |
| २ | सहाय्यक अधिक्षक | S-13 : 35400-112400 | २ | २ | २ | ६ |
| ३ | टिप्पणी सहाय्यक | S-10 : 29200-92300 | २ | २ | २ | ६ |
| ४ | लिपिक-टंकलेखक | S-6 : 19900-63200 | १ | १ | १ | ३ |
| ५ | शिपाई | S-1 : 15000-47600 | १ | १ | १ | ३ |
| | एकूण | | ७ | ७ | ७ | २१ |

३. वेतन पडताळणी पथकातील अधिकारी /कर्मचारी यांच्या वेतन व भत्यावरील खर्च वित्त विभाग, मागणी क्रमांक:जी-५,मुख्य लेखाशिर्ष-२०५४ संचालनालय,लेखा व कोषागारे ०९५ (०१) संचालनालय, लेखा व कोषागारे (२०५४००३१) या लेखाशिर्षाखाली सन २०२०-२०२१ या वित्तीय वर्षासाठी मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या बेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०२००९०९१७४९५३०७०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

INDRAJEET SAMBHAJI GORE

Digitally signed by INDRAJEET SAMBHAJI GORE
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=6015944fe7d58a83f4a54c43147b5da1e34861e2984e9f793b66f7249aaa9c1a, postalCode=400032, street=Y-5/66,GOVERNMENT COLONY,MUMBAI,
serialNumber=d4994742192306fcc1dea9aadd3810639506519fa652b919767b98b04e905a18, ou=FINANCE DEPUTY SECRETARY, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=INDRAJEET SAMBHAJI GORE
Date: 2020.09.09 17:55:02 +05'30'

**( इंद्रजित गोरे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१.महालेखापाल-१ (ले व अ), महाराष्ट्र,मुंबई.
२.महालेखापाल-२(ले व अ), महाराष्ट्र,नागपूर
३.महालेखापाल-१(लेखापरीक्षा ),महाराष्ट्र,मुंबई
४.महालेखापाल-२(लेखापरीक्षा ),महाराष्ट्र,नागपूर
५.अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
६.मा.राज्यपालांचे सचिव
७.मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
८.मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव
९.सर्व मा.मंत्री व मा.राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक
१०.सामान्य प्रशासन विभाग (१९- अ)

११.मंत्रालयीन सर्व विभाग
१२.संचालक,लेखा व कोषागारे,मुंबई
१३.सर्व सहसंचालक,लेखा व कोषागारे
१४.वेतनपडताळणी पथक,मुंबई/कोकण भवन/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर
१५.कार्यासन अधिकारी,कोषागारे प्रशासन १ ते ३ / अर्थसंकल्प-४/आकृतीबंध पुनर्रचना कक्ष,
१६.निवड नस्ती,सेवा-७,